**महाराष्ट्र फुटबॉल मिशन “१ मिलीयन” क्रीडा सुविधा निर्माण करण्यासाठी आर्थिक सहाय्य योजनेतून निधी वितरीत करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
### शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१७/प्र.क्र.१४६/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ ऑगस्ट, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:फिफामि-२०१७/प्र.क्र.१००/क्रीयुसे-१, दिनांक ०७ जुलै, २०१७.

२) शासन पत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:फिफामि-२०१७/प्र.क्र.१००/क्रीयुसे-१, दिनांक १२ जुलै, २०१७.

३) सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक:क्रीसुनि/निधी वितरण/२०१७-१८/का-९/३७११, दिनांक २४ जुलै, २०१७.

**प्रस्तावना :-**

फेडरेशन ऑफ इंटरनॅशनल फुटबॉल असोसिएशन (FIFA) मार्फत १७ वर्षाखालील गटाच्या फुटबॉल वर्ल्ड कप स्पर्धा भारतात होत आहेत. त्यापैकी सहा सामने मुंबई येथे होणार आहेत. या पार्श्वभुमीवर राज्यात फुटबॉल खेळाची आवड निर्माण व्हावी व अधिकाधिक मुलांना फुटबॉल खेळण्यासाठी प्रवृत्त व्हावे यासाठी महाराष्ट्र फुटबॉल मिशन “१ मिलियन” हा उपक्रम राबविण्यात येत असून या अंतर्गत राज्यातील निवडक ३३ हजार शाळा / महाविद्यालयांना १ लाख फुटबॉलचे वाटप करण्यात येणार आहे. सदर फुटबॉल खरेदीसाठी क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य करणे या योजनेतून निधी वितरीत करण्यास संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. या योजनेसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात रु.१०००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. सदर तरतूदीपैकी रु.७००.०० लक्ष इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय :-

उपरोक्त पार्श्वभूमीवर संदर्भाधिन क्र.१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयानुसार क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य या योजनेतर योजनेकरीता सन २०१७-१८ या वर्षाकरिता रु.१०००.०० लक्ष अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रकमेपैकी रु.७००.०० लक्ष तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१७-१८ मध्ये क्रीडा विद्यापीठाची स्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या रु.१०००.०० लक्ष एवढया तरतुदी मधून निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

III. महाराष्ट्र फुटबॉल मिशन “१ मिलीयन” या कार्यक्रमाखाली फुटबॉल या क्रीडा प्रकारामध्ये क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण देणे, खेळाच्या दर्जात सुधारणा करणे हे उद्दिष्ट गाठण्यात येईल याची दक्षता घ्यावी. त्यासाठी दिनांक १ मार्च, २०१७ मधील क्रीडा सुविधासाठी अर्ज करण्याची अट एक वेळची बाब म्हणून शिथील करण्यात येत आहे.

IV. संदर्भाधिन क्र.२ च्या पत्रामध्ये नमूद करण्यात आलेल्या अटी/शर्तींच्या अधिन राहून सदर निधी वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र.ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (४०) क्रीडा सुविधा, (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्मितीसाठी सहाय्य, ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), (२२०४ ५७०६)” या लेखाशीर्षाखालील सन २०१७-१८ वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दिनांक २४.०७.२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१) वित्त विभागाच्या दिनांक ३०.०६.२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये ७०% निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत

४.२) सन २०१७-१८ या वर्षाकरिता क्रीडा सुविधा निर्मितीसाठी सहाय्य याकरिता चालू आर्थिक वर्षात रु.१०००.०० लक्ष अर्थसंकल्पीत आहे.

४.३) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.५) दिनांक २४.०७.२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.६) उपरोक्त परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभाग दिनांक १८.०४.२०१७ व दिनांक २४.०७.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १८.०४.२०१७ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२३१६४३२९१८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.08.23 16:32:25 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर

९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत),
१३. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (क्रीयुसे-१)